**प्रमुख खनिजाच्या खनिज**
**सवलतीसंदर्भात राज्यस्तरीय समन्वय**
**तथा उच्चाधिकार समिती गठीत करणे**

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्र. एमएनजी-१००९/ प्र.क्र.२९४२/उ-९
मंत्रालय मुंबई-३२
दिनांक- ३०.०३.२०१०

**प्रस्तावना-**

प्रमुख खनिजासंदर्भातील खनिज सवलती मंजूर करतांना विविध स्तरावर लागणारा कालावधी कमी करण्याच्या दृष्टीने विविध विभागात समन्वय साधणे आणि विविध पूर्वपरवानगी देण्याच्या कार्यपध्दतीचे संनियत्रण करण्यासाठी शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

प्रमुख खनिजासंदर्भातील खनिज सवलती मंजूर करण्यातील कालावधी कमी करणे व या कार्य पध्दतीचे संनियत्रण करण्यासाठी राज्यस्तरीय समन्वय व उच्चाधिकार समिती गठीत करण्यात येत आहे. या समितीत पुढील सदस्यांचा समावेश राहील.

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव (उद्योग व खनिकर्म) | सदस्य |
| ३. | अपर मुख्य सचिव (महसूल)<br>महसूल व वन विभाग | सदस्य |
| ४. | अपर मुख्य सचिव (वने)<br>महसूल व वन विभाग | सदस्य |
| ५. | सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग | सदस्य |
| ६. | संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय<br>नागपूर | सदस्य सचिव |

**कार्यकक्षा-**

१) खनिज सवलतींसाठी क्षेत्र उपलब्धतेसंदर्भात महसूल विभागाशी समन्वय साधणे.

२) केंद्रीय वन व पर्यावरण मंत्रालयाकडून खनिज सवलत धारकाला घ्याव्या लागणा-या पूर्वपरवानगीबाबत प्रकरण निहाय प्रगतीचा आढावा घेणे.

३) राज्य शासनाच्या स्तरावरुन खनिज सवलत धारकाला घ्याव्या लागणा-या ना हरकत प्रमाणपत्रे / परवानगी यासाठी विविध विभागांतर्गत समन्वये साधणे.

४) खनिज सवलत मंजूरीतील विविध स्तरावरील लागणारा कालावधी कमी करण्यासाठी उपाय सुचविणे,प्रलंबित प्रकरणाचा आढावा घेणे.

**कार्यपध्दती-** समितीची बैठक शक्यतो प्रत्येक तीन महिन्यातून एकदा होईल. समितीने घेतलेल्या निर्णयानुसार करण्यात आलेल्या कार्यवाहीचाआढावा समितीने घ्यावा. समितीने केलेल्या कार्यवाहीचा अहवाल केंद्रीय समन्वय तथा उच्चाधिकार समितीला सदस्य सचिवांनी सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,




(किशोर कदम)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

मा. मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन, मंत्रालय मुंबई ३२
अपर मुख्य सचिव (महसूल) महसूल व वन विभाग मंत्रालय मुंबई ३२
अपर मुख्य सचिव (वने) महसूल व वन विभाग मंत्रालय मुंबई-३२
प्रधान सचिव (उद्योग व खनिकर्म) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग मंत्रालय, मुंबई.
सचिव (पर्यावरण) पर्यावरण विभाग मंत्रालय, मुंबई-३२
संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय नागपूर
मा.मुख्यमंत्री यांचे उपसचिव मंत्रालय मुंबई-३२
मा.राज्यमंत्री खनिकर्म यांचे खाजगी सचिव मंत्रालय मुंबई -३२
मा.मुख्य सचिवांचे कार्यालय मंत्रालय मुंबई -३२
निवड नस्ती कार्यासन उद्योग -९